अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्प, ता.राजापूर, जि. रत्नागिरी - चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१४/६०२/( प्र.क्र.२५०/१४)/ म.प्र.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २३ जून, २०१७.

संदर्भ :- १) पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्र.एआरजे १०८७/१३१४/(१९१/८७)/जसंअ, दि.०५/१२/१९९५.
२) पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्र.अर्जुना १०.०१/६७३/(१६५/२००१)/म.प्र., दि.०५/०५/२००१.
३) पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्र.अर्जुना १०.०१/८०९/(१५७/२००३)/म.प्र., दि.०३/११/२००४.
४) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्र.सुप्रमा २००९/६६१/(२१८/२००९)/म.प्र., दि.२६/०८/२००९
५) कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.कोंपाविम/तां.१/अर्जुना/चतुर्थसुप्रमा/२७०७/२०१४, दि.४/९/२०१४.
६) कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.कोंपाविम/तां.१/अर्जुना/चतुर्थसुप्रमा/नि.वि./९६३/२०१७, दि.१/४/२०१७.

**प्रस्तावना:-**

अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्प या योजने अंतर्गत ता.राजापूर, जि.रत्नागिरी येथील अर्जुना नदीवर मौजे करक गावाजवळ ११४५.५० मीटर लांबीचे माती धरण व १०० मीटर लांबीचा ओगी पध्दतीचा द्वार विरहित सांडवा बांधण्याचे प्रस्तावित आहे. त्यापैकी प्रकल्पाचे माती धरणाचे काम पूर्ण झाले आहे.

या प्रकल्पाद्वारे रत्नागिरी जिल्ह्यातील राजापूर तालुक्यातील १४ गावे व लांजा तालुक्यातील ५ गावातील ४७०४ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळणार आहे. धरणाच्या पायथ्याशी १.५० मे. वॅट क्षमतेचा जलविद्युत प्रकल्प खाजगीकरणांतर्गत प्रस्तावित आहे. प्रकल्पाचा संकल्पित पाणीसाठा ७४.६७ द.ल.घ.मी. आहे.

अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्पास संदर्भ क्र.१ नुसार सन १९९३-९४ चे दरसूचीवर आधारित रू.६१८८.३३२ लक्ष (रूपये एकसष्ठ कोटी अठ्यांशी लक्ष तेहतीस हजार दोनशे फक्त) इतक्या रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता, संदर्भ क्र.२ नुसार सन १९९९-२००० चे दरसूचीवर आधारित रू.१४५४५.५५ लक्ष (रूपये एकशे पंचेचाळीस कोटी पंचेचाळीस लक्ष पंचावन हजार फक्त) इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता, संदर्भ क्र.३ नुसार सन २००३-०४ च्या दरसूचीवर आधारित रू.२६१३६.०६५ लक्ष (दोनशे एकसष्ठ कोटी छत्तीस लक्ष सहा हजार पाचशे फक्त) इतक्या रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता व संदर्भ क्र.४ नुसार सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित रू.४७६४९.१३९ लक्ष (रूपये चारशे श्याहत्तर कोटी एकोणपन्नास लक्ष तेरा हजार नउशे फक्त) इतक्या रकमेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे संदर्भ क्र.५ अन्वये सन २०११-१२ चे दरसूचीवर आधारित रु.७४३०८.६८६ लक्ष (रूपये सातशे त्रेचाळीस कोटी आठ लक्ष अडुसष्ठ हजार सहाशे फक्त) किंमतीचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर करण्यात आला आहे. प्रकल्पाचे लाभ व्यय गुणोत्तर १.४९ आहे.

रु.४७६.४९ कोटी च्या तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या तुलनेत चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाची किंमत रु.२६६.५९ कोटीने जास्त आहे. किंमतवाढीची प्रमुख कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | बाब | वाढ (रुपये कोटी) |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | दरसूचीतील वाढीमुळे | १५७.७२ |
| २ | भूसंपादन किंमतीतील वाढ | १५.१० |
| ३ | संकल्पचित्रातील बदलामुळे झालेली वाढ | ०.०० |
| ४ | जादा दराने निविदा स्विकृती | २.४४ |
| ५ | इतर कारणे (अनुषंगिक खर्चासह) | ९१.३३ |
| | **एकुण वाढ** | **२६६.५९** |

सदर प्रकल्प प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजने अंतर्गत समाविष्ट आहे. प्रकल्पाचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मिळणारे फायदे विचारात घेता हा प्रकल्प किफायतशीर ठरणार आहे. डावा तीर कालवा लांबी ३८.७५ कि.मी. व उजवा तीर कालवा लांबी ५७.५६ कि.मी.प्रस्तावित असून सदर कालव्यांची उर्वरित कामे पूर्ण करणेसाठी या प्रकल्पाच्या चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने सदर प्रस्ताव दि.३१/०५/२०१७ रोजी व्यय अग्रक्रम सहमतीच्या पुढे विचारार्थ ठेवला असता व्यय अग्रक्रम समितीने प्रस्तावास काही अटींच्या अधिन राहून मान्यता दिली.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासन आता या निर्णयाव्दारे अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्पाच्या सन २०११-१२ च्या दरसूची वर आधारीत रु.७४३०८.६८६ लक्ष (रुपये सातशे त्रेचाळीस कोटी आठ लक्ष अडुसष्ठ हजार सहासे फक्त) इतक्या किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु. ७१५७६.९४६ लक्ष (रुपये सातशे पंधरा कोटी शहात्तर लक्ष चौऱ्यानव हजार सहाशे फक्त) कामाप्रित्यर्थ व रु.२७३१.७४० लक्ष (रुपये सत्ताविस कोटी एकतीस लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी तरतूद आहे. सोबत उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा दिलेला आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यसनाच्या नोंदवहीमध्ये अनुक्रमांक १ / २०१७ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे उर्वरित काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतूदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष- आय-५- ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०, सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका,(०२) योजनांतर्गत, (०२) (०३) कोंकण पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१एच ७५४) अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्प या लेखाशीर्षाखाली टाकावा व त्याखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

५.१ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयी करण्याच्या विविध टप्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही.

५.२ या प्रकल्पाबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निणर्यामूळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

५.३ नियोजन व वित्त विभागाने ज्या मुद्यांच्या खुलाशासह तसेच पूर्तता करण्याच्या अधीन राहून सदर प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या विचारार्थ सादर केलेला आहे, त्या मुद्यांची पूर्तता करून अनुपालन अहवाल कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी आदेश निर्गमित केल्याच्या तारखेपासून १५ दिवसांचे आत न चुकता शासनास सादर करण्यात यावे. त्यांचे सहपत्र सोबत जोडण्यात येत आहेत.(परिशिष्ठ-१,२ व ३)

५.४ व्यय अग्रक्रम समितीने दि.३१ मे, २०१७ च्या बैठकीत पुढील अटींच्या पूर्ततेच्या अधिन अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्पाचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव मान्य करण्यात यावा, असे कळविले आहे. त्याची पूर्तता कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी करावी.

५.४.१. जलसंपदा विभागाच्या दि. २ मे, २०१७ च्या शासन निणर्यानुसार या प्रकल्पांतर्गतच्या लाभक्षेत्रास सुक्ष्म सिंचनास पुरक वितरण व्यवस्था निर्माण करण्याच्या अनुषंगाने आढावा घेऊन भूसंपादनावरील खर्चातील बचतीचा विभागाने प्राधान्याने आढावा घ्यावा.

५.४.२.चालू आर्थिक वर्षात निधी उपलब्धतेच्या अनुषंगाने नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीनंतरच प्रकल्पासाठीच्या कामांची निविदा प्रक्रिया सुरु करण्यात यावी.

५.४.३.प्रकल्पाचे काम विभागाने चालू आर्थिक वर्षात पूर्ण करणे बंधनकारक राहील.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.१०१/का.१४३४ दि.२०/०४/२०१७, वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.१०६/२०१७/ व्यय १२, दि.२९/०५/२०१७ व दि.३१/०५/२०१७ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०६२३१६५३४५४६२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Arjunrao Kosare

Digitally signed by Sharad Arjunrao Kosare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=EE AND UNDER SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05feaaf7bd630f771059a9456120cce7272c9feb25bd346ca1debdd0f08fce23, cn=Sharad Arjunrao Kosare
Date: 2017.06.23 16:54:34 +05'30'

**( श.अ.कोसारे )**
शासनाचे अवर सचिव

**सहपत्र :- १) उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**
**२) नियोजन व वित्त विभागाचे शेरे**
**परिशिष्ठ-१, परिशिष्ठ-२, परिशिष्ठ-३**

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई.
१५) उपसचिव (मो.प्र-१/ मो.प्र-२/जसं/निवसं/सिं.व्य./ला.क्षे.वि./ल.पा.), यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधिक्षक अभियंता, कोंकण पाटबंधारे मंडळ, कुवरबांव, रत्नागीरी.
१८) कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, रत्नागीरी.
१९) वित्त विभाग ( व्यय-१२/ अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

# उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा

**अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्प, ता.राजापूर, जि.रत्नागीरी**

**चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०१४/६०२/(प्र.क्र.२५०/१४)/म.प्र.,दि. २३/०६/२०१७ चे सहपत्र.**

| अ.क्र. | उपशीर्ष | चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १) | ए- प्राथमिक | ४८२.८६२ |
| २) | बी- जमिन | ७६९७.३५८ |
| ३) | सी-कामे | ३६३१०.९५७ |
| ४) | डी-विमोचक | १८२५.८१७ |
| ५) | ई-प्रपात | ८९.२८९ |
| ६) | एफ- आर.एच.टी.कामे | ३३१३.३९३ |
| ७) | जी-पुल | १३६७.९४० |
| ८) | एच-एस्केप | १४४.३२० |
| ९) | के-इमारत | ३८५.६६४ |
| १०) | एल-मातीकामे | १६१४३.६३८ |
| ११) | एम-वृक्षारोपण | १५.३२५ |
| १२) | ओ-संकीर्ण | ६३.३८६ |
| १३) | पी-देखभाल व दुरुस्ती | ३३७.४६४ |
| १४) | क्यू-हत्यारे व सयंत्रे | १०.००० |
| १५) | आर- दळणवळण | ११८३.२९७ |
| १६) | वितरिका भाग ३ | २११०.१६० |
| १७) | इतर संकिर्ण | ९६.०७६ |
| | **एकूण कामाप्रित्यर्थ** | **७१५७६.९४६** |
| | **आस्थापना व अनुषंगिक खर्च (E.T.P. Charges)** | **२७३१.७४०** |
| | **एकूण** | **७४३०८.६८६** |

# परिशिष्ठ-१

## नियोजन विभागाचे शेरे

(१) जलसंपदा विभागाच्या दि. १९/९/२०१६ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या निदेशानुसार कार्यवाही करावी. **(सोबतचे परिशिष्ट - पृ.२१६)**

(२) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्दा क्र. १ ते ६ मधील अटींची पूर्तता करण्यात यावी. **(पृ. १० / प. वि.)**

(३) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

(४) प्रकल्प नियोजनानुसार सन २०१९ पर्यंत पूर्ण करण्यात यावा व त्यासाठी जलसंपदा विभागाने आवश्यक निधीचे नियोजन करावे.

(५) परि.१४ (२) मध्ये नमूद केल्यानुसार रु.७०.९५ कोटी किंमतीचे दावे वेळीच क्लेम समितीस सादर करण्यात आले नाहीत. सदर अनियमिततेबाबत संबंधितांवर जबाबदारी निश्चित करुन कारवाई होणे आवश्यक आहे.

(६) प्रगतीपथावरील निविदांची कामे प्राधान्याने पूर्ण करण्यात यावीत. पाणीसाठ्याचा सिंचनाकरिता जास्तीत जास्त लाभ होईल अशा प्रकारे उर्वरित कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे/ निविदा प्रकिया करण्यात यावी.

वरील मुद्यांची पूर्तता करण्याची जबाबदारी जलसंपदा विभागाची राहील.

वरीलप्रमाणे.

तसेच जास्त दराच्या निविदा स्वीकृतीमुळे रु. २.४४ कोटी वाढ झाली आहे. एकूण वाढीच्या तुलनेत सदर वाढ कमी (०.५२%) आहे. परंतु निविदा स्वीकृतीस सक्षम स्तरावर मान्यता असल्याची जलसंपदा विभागाने खातरजमा करुन घ्यावी

# परिशिष्ठ-२
# वित्त विभागाचे शेरे

१५. याबाबत वित्त विभागाचे अभिप्राय खालीलप्रमाणे नमूद करण्यात येत आहेत :-

(१) सदर प्रकल्पाला सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित तृतीय सु.प्र.मा. दि.२६.०८.२००९ रोजी देण्यात आलेली आहे. आता, सन २०११-१२ च्या दरसूचीवर आधारित चतुर्थ सु.प्र.मा. जवळजवळ आठ वर्षे विलंबाने सादर करण्यात आली आहे. सदर विलंबाबाबतचा खुलासा व जबाबदारी निश्चिती बाबत विभागाने खुलासा करावा.

(२) प्रकल्पाचे माती धरणाचे काम पूर्ण झाले आहे. तथापि, कालव्याची सुमारे ३० टक्के कामे पूर्ण झाली नाहीत. त्यामुळे प्रकल्प नियोजनानुसार सन २०१९ पर्यंत चतुर्थ सु.प्र.मा. किमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्याची जबाबदारी जलसंपदा विभागाची आहे, याबाबतची हमी विभागाने द्यावी.

(३) सुमारे ३८८.६७२ हेक्टर भूसंपादन करावयाचे शिल्लक आहे. सदर प्रकल्प PMKSY मधील असून सन २०१९ पर्यंत प्रकल्प पूर्ण करावयाचा असल्याने हे उर्वरित भूसंपादन करण्याबाबतचे नियोजन, जलसंपदा विभागाने स्पष्ट करावे. त्याचप्रमाणे नलिका वितरण प्रणालीचा पर्याय उपलब्ध असल्यामुळे हे काम कालमर्यादेत पूर्ण होणे शक्य आहे काय याबाबत विभागाने खुलासा करावा.

(४) प्रकल्पाचे तृतीय सु.प्र.मा. अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित होते. प्रस्तावित चतुर्थ सु.प्र.मा. अंदाजपत्रक सन २०११-१२ च्या दरसूचीवर आधारित आहे. या दरसूचीतील फरकामुळे रु.१५७.७२ कोटी इतक्या मोठ्या प्रमाणात वाढ झालेली आहे. सदर वाढीबाबत खुलासा करण्यात यावा.

(५) इतर कारणांमुळे झालेली वाढ रु.८३.०६ कोटी इतकी आहे. यामध्ये क्लेम समितीकडील दाव्याच्या रकमेचा समावेश आहे. याबाबतच्या न्यायालयीन प्रकरणांचा वेळोवेळी पाठपुरावा करण्यात यावा.

(६) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील ३ (अ) मधील १ ते ६ येथील अटींच्या पूर्ततेबाबत खुलासा करण्यात यावा.

(७) प्रकल्पाचे काम पूर्ण करण्याबाबतचे आर्थिक नियोजन सादर करण्यात यावे.

(८) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात जलसंपदा विभागाने प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे जलसंपदा विभागाची राहील.

(९) सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना वित्त विभागाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही व अशी कोणतीही सहमती/मान्यता वित्त विभागाने प्रस्तुत प्रकल्पाबाबत दिलेली नाही. अशा प्रत्येक प्रकरणी व अशा प्रत्येक बाबीवर जलसंपदा विभागाने विहित कार्यपध्दती अनुसरुन सक्षम प्राधिकाऱ्याची, नस्ती सादर करुन अभिप्राय घेणे/मान्यता घेणे अत्यावश्यक राहील व ही सर्वस्वी जलसंपदा विभागाचीच जबाबदारी राहील.

(१०) सदर प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीत दि.३१.०५.२०१७ रोजी ठेवण्यात येणार असल्याने तसेच सदर नस्ती नियोजन विभागाकडून या विभागास आज दि.२९.०५.२०१७ रोजी प्राप्त झाली असल्याने वेळेअभावी सदर प्रकल्पाची सविस्तर छाननी वित्त विभागास करणे शक्य झालेले नाही.

उपरोक्त मुद्दयांच्या खुलाशासह तसेच पूर्तता करण्याच्या अधीन राहून सदर प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या विचारार्थ सादर करण्यास वित्त विभागाची सहमती दर्शविण्यास हरकत नसावी.

तथापि आदेशार्थ सादर.

# परिशिष्ठ-३

## राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीची ४० बैठक

३) बैठकीत झालेली चर्चा व घेतलेले निर्णय :

[अ] अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्प ता.राजापूर जि.रत्नागीरी :

या प्रकल्पाच्या चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यता अहवालावर झालेल्या चर्चेच्या वेळी श्री.ह.का.गोसावी, कार्यकारी संचालक, को.पा.वि.म., ठाणे हे उपस्थित होते. हा मध्यम प्रकल्प A.I.B.P. अंतर्गत असून शिर्षकामे जवळपास पूर्ण होत आली आहेत असे त्यांनी सांगितले. प्रस्तावावर खालील प्रमाणे सविस्तर चर्चा झाली.

१. प्रकल्पाच्या उजव्या व डाव्या कालव्याची सुरुवातीची काही लांबी वगळता पुढील लांबीतील कालव्याची संरेखा मंजूर नसून त्याच्या मातीकाम व बांधकामाची सविस्तर अंदाजपत्रके देखील केलेली नाहीत. ती करणे आवश्यक आहेत.

२. प्रकल्पाच्या अंदाजपत्रकामध्ये ज्या कामाच्या बाबीसाठी दरसूचीबाह्य दर प्रस्तावित आहेत, त्यांना कार्यकारी संचालक यांची पूर्वमान्यता असणे आवश्यक आहे.

३. कालव्याच्या काही लांबीमध्ये अस्तरीकरण करण्यास शासनाची मान्यता असली तरी शासनाच्या दि.१७.०३.१९९४ च्या परिपत्रकानुसार कार्यवाही व्हावी.

४. सुधारित अंदाजपत्रकामध्ये धरण मातीकामाच्या खाणीत आढळून आलेल्या टोळ काढण्यासाठी रू.२८.९३ कोटी आणि डोझरने माती पसरविणे या कामासाठी रू.१७.६० कोटी एवढी जास्तीचा खर्च झाल्याचे नमूद आहे. ह्या कामाचे Claims महामंडळाने मंजूर केले आहेत असे कार्यकारी अभियंता यांनी सांगितले . तथापि शासन स्तरावरून या तरतुदी कायम ठेवण्याबाबत निर्णय व्हावा.

५. लाभव्यय गुणोत्तर आकडेवारी काढतांना घेण्यात आलेले पिकांचे दर सन २००३-२००४ या वर्षासाठीचे मंजूर असून त्यात प्रतीवर्ष १०% वाढ याप्रमाणे सुधारीत केले आहेत. त्याऐवजी संबंधित खात्याकडून अद्ययावत दर घ्यावेत.

६. मध्यवर्ती संकल्पचित्र संघटनेच्या द.ध. मंडळाने सूचविल्याप्रमाणे पुच्छ कालव्याला RCC अस्तरीकरण करण्याच्या कामाची तरतूद ठेवली आहे. तथापि पुढील काही वर्षे पुच्छ कालव्याचे निरिक्षण करुन मध्यवर्ती संकल्पचित्र संघटनेकडे पुन्हा प्रस्ताव पाठवावा व त्यांच्या अभिप्रायानुसार या कामाच्या आवश्यकतेबाबत पुनर्विचार व्हावा.

७. प्रकल्पाचा समरुपता अभ्यास केला आहे.

८. प्रकल्पाचे लाभव्यय गुणोत्तर १.५९ एवढे येते. प्रकल्प मापदंडात बसतो.

९.

सविस्तर चर्चेअंती उपरोक्त मुद्दा.क्र.१ ते ६ च्या अधिन राहून प्रकल्पाच्या चतुर्थ सुधारित अंदाजपत्रकास Clearance (सहमती) देण्याचे ठरले.